**मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या ७१ अस्थायी पदांना सन २०१८-१९ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : - डब्ल्यूएलपी ०३.१८ /प्र.क्र.१०१/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २७ सप्टेंबर, २०१८

**वाचावे :-**

१. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-३/योजनेतर/ प्र.क्र. २/१७-१८/२१७७, दिनांक :- २२.०२.२०१८.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक :- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दिनांक :- ०५.०३.२०१८.
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक : - डब्ल्यूएलपी ०३१८ /प्र.क्र.१०१ / फ-१, दिनांक :- २७.०३.२०१८.
४. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:- पदनि- २०१६/ प्र.क्र.०८/ आ.पु.क., दिनांक :- ०७.०९.२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या एकूण ७१ अस्थायी पदांना सन २०१८-१९ मध्ये दिनांक ०१.०३.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यत चालू ठेवण्याचा अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक १ च्या पत्रान्वये सादर केला आहे. **वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ च्या शासन निर्णयानुसार** प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या एकूण ७१ अस्थायी पदांना संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये सन २०१७-१८ मध्ये **दिनांक ०१.०३.२०१८ ते दिनांक ३०.०९.२०१८ पर्यत** मुदत वाढ देण्यात आली आहे.

आता **संदर्भ क्रमांक ४ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये** सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना **दिनांक ०१.१०.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यंत** मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक १ च्या पत्रान्वये मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या एकूण ७१ अस्थायी पदांना सन २०१८-१९ मध्ये दिनांक ०१.०३.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यत चालू ठेवण्याकरीता सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन **वित्त विभागाच्या संदर्भ ४ च्या शासन निर्णयान्वये** प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या **एकूण ७१** पदांना **दिनांक ०१.१०.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९** पर्यत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. मुख्य वनसंरक्षक व संचालक संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या एकूण ७१ पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च २४०६-वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर) ०१-वनीकरण, ८००-इतर खर्च, ८००(०१) इतर खर्च (वेतने) (०१) (०२) वन उपवने (२४०६ ०६५९) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. असंक - १००४ / प्र.क्र.१२ /(भाग-२) /२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ व क्रमांक:- पदनि २०१६/ प्र.क्र.०८/१६/ आ.पु.क., दिनांक :- ०७.०९.२०१८ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२७१६२२०१६६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2018.09.27 16:24:09 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
५. मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली.
६. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), म.रा.मुंबई/नागपूर.
७. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).

***********

**शासन निर्णय, क्रमांक डब्ल्यूएलपी-०३१८/प्र.क्र.१०१/फ-१, दिनांक :- २७ सप्टेंबर, २०१८ च्या सोबतचे विवरणपत्र**

******************************************************************************************************

**(दिनांक :- ०१.१०.२०१८ ते दिनाक :- २८.०२.२०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ दिलेली पदे)**

| अ.क्र. | पदनाम | पदनाम |
|---|---|---|
| १ | मुख्य वनसंरक्षक व संचालक | १ |
| २ | सहायक वनसंरक्षक | १ |
| ३ | अधीक्षक सिंहविहार | १ |
| ४ | वनक्षेत्र सर्व्हेक्षक | १ |
| ५ | कार्यालय अधीक्षक | १ |
| ६ | वनपाल व मुख्य प्राणी रक्षक | ९ |
| ७ | वाहन चालक | २ |
| ८ | वनरक्षक | ३२ |
| ९ | लिपिक | ६ |
| १० | चौकीदार | ४ |
| ११ | गँगमन | १ |
| १२ | क्लिनर | १ |
| १३ | वॉचमन | ६ |
| १४ | नाईक | १ |
| १५ | शिपाई | ४ |
| | **एकूण अस्थायी पदे** | **७१** |

*****